निशीगंध (कवितासंग्रह)




कवयित्री - कु.निशा भावराव रौंदळ

इयत्ता- ४ थी

जिल्हा परिषद प्राथमिक शाळा

माळीनगर

ता.मालेगाव जि.नाशिक



हे पुस्तक सजवण्यासाठी निशाच्या मित्रमैत्रिणींनी जी चित्रे काढली त्यासाठी आम्ही खालील मुलांचे आभारी आहोत

सायली राजेंद्र मोरे, जागृती उद्धव जगताप, दिक्षा नामदेव जाधव, प्रथमेश दिनेश बागूल, आरती बापू जाधव

प्रकाशक : ई साहित्य प्रतिष्ठान

www. esahity. com

esahity@gmail. com

प्रकाशन : १५ ऑक्टोबर २०१६

(वाचन प्रेरणा दिन)( ए पी जे अब्दुल कलाम जयंती)





निशीगंध

माझे आई वडील व शिक्षकांना समर्पित ....

निशा रौंदळ

# मनोगत

प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र घडविण्यासाठी शिक्षण क्षेत्रातील प्रत्येक घटक जीव ओतून काम करतोय. ज्ञानरचनावाद, ABL, DIGITAL SCHOOL चा पुरस्कार करत आपण धावत आहोत. प्रत्येक मूल शिकलं पाहिजे, समृद्ध झालं पाहिजे ह्या भावनेतून आपण सर्वच प्रयत्न करत आहोत. विद्यार्थ्यांच्या भावविश्वातील कल्पनांना शब्दांचे पंख मिळण्याच्या प्रयत्नातून आम्ही कवितालेखनासाठी विद्यार्थ्यांना प्रोत्साहीत केले. त्यातूनच आम्हांला निशाच्या रूपाने छोटी बहिणाबाई गवसली.

आमची कु. निशा रौंदळ 'निशीगंध'काव्यसंग्रह घेवून आलीय. स्वतः TAB मध्ये TYPE करत तंत्रज्ञानाची कास धरत –'TAB आपण घेवू, पुढे आपण जाऊ' सांगतेय. स्वतःचे भावविश्व ती ई साहित्य प्रतिष्ठानच्या साक्षीने उलगडतेय . 'कविता रानफुलांच्या' आमच्या चिमुकल्यांच्या काव्यसंग्रह ई टीमने जगभरात पोहोचवला. पुन्हा मराठी भाषेला टिकविण्यासाठी आमचा काव्यसंग्रहाच्या रूपातून ई टीमच्या सहाय्याने छोटासा प्रयत्न.

प्रत्येक मूल बोलतो, लिहितो, व्यक्त होतो यावर आमचा पूर्ण विश्वास. कु. निशा ही एक प्रातिनिधिक स्वरूप समजतो.

सदर काव्यसंग्रहास महाराष्ट्र राज्याचे शिक्षण संचालक आदरणीय मा. गोविंद नांदेडे साहेब यांचा शुभेच्छा संदेश मिळाला, हे आमचे परमभाग्यच. प्रेरणादायी संदेश हा आम्हां शिक्षकांना खूप बळ देणारा आहे. 'निशिगंध' काव्यसंग्रहासाठी श्री. विक्रम अडसूळ (सदस्य, महाराष्ट्र राज्य अभ्यासक्रम व

पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ, पुणे)यांची प्रस्तावना असून साध्या नि सोप्या मांडणीने उर्जा देणारी, लेखनास बळ देणारी बाब समजतो. मा. डी. एस. गायकवाड (गटशिक्षणाधिकारी मालेगाव), मा. एस. ए. निकम (शि. वि. अधिकारी मालेगाव), मा. एन. एम. पवार(केंद्रप्रमुख वडनेर), आमचे मुख्याध्यापक श्री. राजेंद्र बधान सर प्रेरणास्त्रोत आहेत. सर्वांचे यावेळी ऋण व्यक्त करतो. ई साहित्य प्रतिष्ठान टीमचे श्री. सुनील सामंत व संपूर्ण टीमचे यावेळी मी ऋण व्यक्त करतो.

निशिगंध काव्यसंग्रहास शुभेच्छा देणाऱ्या तमाम महाराष्ट्रातील गुरुजनांचा, वाचकांचा ऋणी आहे. कु. निशास व आम्हांस आपले शब्दरूपी आशीर्वाद निश्चितच बळ देतील.

धन्यवाद.

भरत पाटील

जिल्हा परिषद प्राथमिक शाळा माळीनगर

ता.मालेगाव जि.नाशिक

email-bharatpatil7988@gmail.com

blog - dnyanjoti.blogspot.in

प्रत्येक मूल बोलतो, लिहितो, व्यक्त होतो यावर आमचा पूर्ण विश्वास. कु. निशा ही एक प्रातिनिधिक स्वरूप समजतो.

## प्रस्तावना

कुमारी निशा भावराव रौंदळ ही जिल्हा परिषद प्राथमिक शाळा माळीनगर ता. मालेगाव जि. नाशिक या ग्रामीण भागातील चार घरांच्या वस्तीत असलेल्या शाळेत इयत्ता चौथीमध्ये शिकणारी मुलगी. तिचा 'निशिगंध' हा काव्यसंग्रह बालमनातील आविष्कार असे म्हणत येईल. साध्या साध्या शब्दातून, रचनातून कवयित्री आपल्या भावना अंत:करणातील खळबळ व्यक्त करत असल्याने त्या सहज मनाला भिडतात.

प्रत्येक मूल हे वेगळं असतं. त्याची आकलनक्षमता वेगळी असते. भावविश्व वेगळं असतं आणि एक शिक्षक म्हणून आपल्या वर्गातील, शाळेतील मुलांच्या भावविश्वाचा शोध घेण हे प्रत्येक शिक्षकाचं काम असतं. प्रत्येक शिक्षकाने आपल्या समोरील मुल समजून घेतलं पाहिजे. सदरील निशाचा कवितासंग्रह वाचल्यावर आपल्या हे लक्षात येते कि, तिच्या शिक्षकांनी हे काम केलं. प्रत्येक मुल हे आपल्या भावना व्यक्त करायला शिकले पाहिजे आणि शिक्षकांनीही त्या भावना समजून घेतल्या पाहिजेत.

कु. निशा हिच्या कविता या परिस्थितीनुरूप लिहिलेल्या आहेत. ती आपल्या 'आई'या कवितेत म्हणते-

आई माझी सुंदर

ती माझा पुरंदर

आईने दिले सुख

कधी नाही देणार दुख

याचा अर्थ असा की, तिला आईचे महत्त्व कळाले आहे. आईचे तिच्यावर असलेले प्रेम, तिने शिक्षण घ्यावे म्हणून आई करत असलेली धडपड तिला समजली आहे. निशा हिने लिहिलेल्या कविता ह्या निसर्ग, शाळा, तंत्रज्ञान, समाज व सहकारी मित्र या सर्व घटकांशी निगडित आहेत. तिला तंत्रज्ञानातील बऱ्याच गोष्टी माहित असल्याचे तिच्या प्रोजेक्टर, टॅब या कवितांमधून दिसून येते, तसेच भारतीय सांस्कृतिक वारसा ही तिने जाणून घेतला आहे, हे तिच्या दहीहंडी, मकरसंक्रांती या कवितांवरून दिसून येते. अशा बऱ्याच जमेच्या बाजू तिच्या लेखनातून दिसून येतात. मूल्यशिक्षण आणि त्याचे जीवनातील महत्त्व तिने जाणले आहे. समाजामध्ये काम करून आपल्या पोटाची खळगी भरणाऱ्या आपल्या वडिलांविषयी आस्था, प्रेम असल्याचे दिसून येते. तिची ‘शेतकरी’ही कविता वाचल्यावर ‘श्रमप्रतिष्ठा’हे मूल्य तिच्या मनात खोलवर रुजलेले दिसुन्येते. ती आपल्या ‘शेतकरी’ या कवितेत आपल्या वडिलांच्या माध्यमातून संपूर्ण जगाचा पोशिंदा असणाऱ्या शेतकरी समाजावर कटाक्ष टाकायला भाग पडते. ती म्हणते-

शेतकरी करतो काम

आम्ही खाल्ला जाम

शेतकरीचे नाव राम

बाप करतो काम

एकंदरीत सर्व कविता वाचल्यास आपल्याला कु. निशाच्या मनातील घालमेल, कल्पनाशक्ती तिची वैचारिकता व भावविश्व लक्षात येते.

हा कवितासंग्रह वाचल्यावर आपल्या लक्षात येते की, प्रत्येक मूल लिहू शकते. आपल्या मनातील भावना, कल्पना व्यक्त करू शकते. सदरील काव्यसंग्रहास

महाराष्ट्र राज्याचे शिक्षण संचालक आदरणीय मा. गोविंद नांदेडे साहेब यांनी दिलेला शुभेच्छा संदेश ही एक जमेची बाजू आहे. त्यांनी केलेले कौतुक आणि दिलेली शाबासकीची थाप ही संपूर्ण महाराष्ट्रातील विद्यार्थी व शिक्षक यांना शिक्षण क्षेत्रात काम करण्यासाठी, समृद्धीसाठी, प्रत्येकजण प्रगल्भ होणेसाठी मिळालेले ‘दहा हत्तींचे बळ’असे म्हणता येईल.

सदरील काव्यसंग्रह पूर्णत्वास आणण्यासाठी शाळेचे मुख्याध्यापक श्री. राजेंद्र बधान, शाळा व्यवस्थापन समिती, तिचे आई-वडील, मित्र-मैत्रिणी व खास करून निशाच्या लेखनास ज्यांनी स्फुर्ती दिली असे तिचे शिक्षक श्री. भरत पाटील यांचा मोलाचा वाटा आहे.

आज ग्रामीण भागातील विद्यार्थ्यांच्या नवप्रतिभा जाग्या होत आहेत. व्यक्त होत आहेत आणि त्या व्यक्त होण्यात उद्याच्या क्रांतीची बीजे आहेत. याचे भान या काव्यसंग्रहामुळे येते.

कु. निशा भावराव रौंदळ हिचा हा पहिलाच कवितासंग्रह त्यात शब्दांच्या मोठ्या कवींची सर्व लक्षणे आहेत. तिला पुढील वाटचालीसाठी खूप खूप शुभेच्छा.

आज ग्रामीण भागातील विद्यार्थ्यांच्या नवप्रतिभा जाग्या होत आहेत. व्यक्त होत आहेत आणि त्या व्यक्त होण्यात उद्याच्या क्रांतीची बीजे आहेत. याचे भान या काव्यसंग्रहामुळे येते.

विक्रम अडसूळ

सदस्य, महाराष्ट्र राज्य अभ्यासक्रम व

पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ, पुणे




Government of Maharashtra



**महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद**

**(विद्या परिषद)**

**७०८, सदाशिव पेठ, कुमठेकर मार्ग, पुणे ४११०३०, महाराष्ट्र**

गोविंद नांदेडे,
संचालक

## शुभेच्छा संदेश

जिल्हा परिषद प्राथमिक शाळा माळीनगर ता. मालेगाव जि. नाशिक या शाळेतील इ. ४ थी मध्ये शिकणाऱ्या कु. निशा भावराव रौदळ या विद्यार्थीनीचा काव्यसंग्रह वाचला. वाचल्यानंतर तो मनाला खूपच भावला. जिल्हा परिषद शाळेमध्ये शिकणारी मूले ही इतक्या प्रगल्भतेने लिहू शकतात, आपल्या भावना स्वतःच्या लिखानातून व्यक्त करु शकतात याची प्रचिती आली.

सध्या महाराष्ट्रामध्ये प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र अभियाना अंतर्गत प्रत्येक शाळा स्वतःच रुप बदलत आहेत, शाळेतील शिक्षक प्रत्येक मूलाला प्रगल्भ करण्यासाठी प्रयत्न करताना दिसत आहे. 'निशीगंध' हा काव्यसंग्रह सपूर्ण महाराष्ट्रातील शाळांना एक दिशा देणारा ठरेल असा मला विश्वास आहे. हा कविता संग्रह पूर्णत्वास नेण्यासाठी कु. निशाचे शिक्षक श्री. भरत पाटील यांचेही खुप अभिनंदन व शुभेच्छा.

खुप खुप अभिनंदन व पुढील लिखाणास शुभेच्छा !

(गोविंद नांदेडे)
संचालक
महाराष्ट्र राज्य, शैक्षणिक संशोधन व
प्रशिक्षण परिषद, पुणे ३०

दूरध्वनी : (०२०) २४४७ ८९२२, २४४७ ३८७७ email : dir.mscert@gmail.com Website : www.mscert.org.in

# अनुक्रमणिका

शाळा नसती तर......

वाढदिवस...

महात्मा फुले जयंती ...

सुट्टी

घर...

झाड ...

दहिहंडी...

शेतकरी ...

पोळा

ज्ञान ...

टॅब ...

ढग ...

विद्यार्थी ...

पाऊस...

पक्षी

शाळा.. ....

# आई...

मला आवडते आई

आईची बहिण ताई

दोघांचे एकच रक्त

माझी आई देवाची भक्त

आई सांगते गोष्ट

तो पहा दुष्ट

आई आहे सुंदर

ती माझा पुरंदर

आईने दिले सुख

कधी देणार नाही दुख



# रानफुले ..

रानात आहेत रानफुले

आम्ही लहान मुले

रानफुले वाऱ्याने झुलतात

पावसाने ते फुलतात

रानफुले बनवली आम्ही

पाहायला या तुम्ही

रानफुले लावा डोक्याला

आवडते त्यांना झुलायला

रानफुले असतात छान

रानफुंलाचे घर रान



# रविवारी शाळा असती तर...

रविवारी जातो शाळेत

आटकलो जाळेत

शाळा आहे रविवारी

पुढे जाऊ संसारी.

रस्त्याने जातो दुःख सोडता सोडता

दोरी ओडता ओडता

दोरीचा फंदा आटकला गळ्यात

माझी शाळा आहे मळ्यात

रविवारी शाळेत जातो पायपाय

रविवारची शाळा जशी दुधावरची सायसाय



# फुल...

फुला रे फुला तु दिसतो कसा

म्हणतो आम्हाला साडी नेसा

फुला रे फुला १ फुल दे आम्हाला

आमच्या घरी ये पाणी टाकु तुम्हाला

फुला रे फुला तु दिसतो किती छान

आम्ही आहोत तुझ्या सारखे गोरे गोरे पान

फुला रे फुला तु आहे लहान

मी देते तुला मान

फुला रे फुला तु आहे खास

एकदा घेउ दे तुझा वास



## घाई...

मला झाली घाई

लाडु देते ताई

घाईत पळतो फास

लाडु आहे खास

घाईत आले सर पवार

त्यांच्या डिक्कि मध्ये गवार

घाईत पळाला भाऊ

सुई टोचली आऊ

घाईत आला फोन

तो पहा त्रिकोण

घाईचा येत नाही वास

आम्ही खुप खास

# प्रोजेक्टर

आमच्या शाळेत प्रोजेक्टर

कागद कापण्यासाठी लागेल कटर

प्रोजेक्टर चालवण्यासाठी माऊस

आला आला पाऊस

आमच्या शाळेत प्रोजेक्टर

समोर आहे मॉनीटर

संरानी आणले प्रोजेक्टर

इंग्रजी महिना ऑक्टोबर

प्रोजेक्टर देते ज्ञान

आपण घेवू ध्यान

## उन्हाळा ...

आला आला उन्हाळा

आम्ही गेलो पन्हाळा

पन्हाळ्यात पडाला पाऊस

आम्ही केली हाऊस

उन्हाळ्यात पडाला दुष्काळ

किती मोठा तो काळ

पाणी शोधता थकला कावळा

पहा सुर्य मावळला

फळ उगतनाही मातीत

उन्हाळा कोणत्याना नातीत

# मकर संक्राती...

आली आली मकर संक्राती

किती सुंदर आहे क्रांती

मकरसंक्रातीला करू लाडू

नारळ आपण फोडू

मकरसंक्रातीला पतंग आभाळी

बाळाचे मन आभाळी

तीळ होता थोडा

दुख आता सोडा

मकरसंक्राती हा सण मावळला

बाळ पहा सावरला



## परिपाठ ...

आम्ही घेतला परिपाठ

नवा केला घाठ

परिपाठ घेतला बाळ्याने

ज्ञान दिले लकीने

परिपाठ घेतो दर दिवसाला

ज्ञान घेतो दिवसा दिवसाला

शिक्षकांनी शिक्षण दिले परिपाठाचे

शिक्षण आहे ज्ञान घाटाचे

परिपाठच आमचा आत्मा

देवच आमचा परमात्मा

## साहेब ...

आमच्या शाळेत साहेब आले

साहेब सर्वांना देतात शिक्षण

आम्ही देतो त्यावर लक्षण

साहेबांनी दिला अभ्यास

साहेब म्हणतात शाब्बास

साहेब म्हणाले नाही तुम्ही मुले

तुम्ही आहात रानातली फुले

# पाणी ...

आम्ही पिले पाणी

आई आपली जननी

पाणी शोधत आला कुत्रा

एक मुलगा भित्रा

मुलानी बनवली कविता

ती आहे सविता

पाणी आहे शुद्ध

आता होईल युद्ध

पाणी शोधतो मानव

जागा होतो दानव



# नदी...

मी बघितली नदी

पाणी मिळणार कधी

आमचे कुळ जाधव

नदीत उडी मारु नका यादव

नदीत आहेत लाठा

आम्ही बांधल्या गाठा

नदीत आहे गवार

घ्यायला आले पवार

नदीत आहे पाणी

आम्ही गातो गाणी

नदीजवळ छोकरी

कृष्णा वाजवितो बासरी



# हम कोण?

एक था डूबाडूबा

दुसरा तोबातोबा

एक था बाबाजी

उनकी सुनो जी

एक करे बात

भाजीपाला खात

बच्चीका नाम नंदिनी

दुसरी है बंदिनी

बाबाजी का कहना

तुम रहना शाकाहारी

# जीवन ...

देवाने दिले जीवन

एका मुलाचे नाव जीवन

आता मरले पक्षी

मी काढली नक्षी

आम्हांला मिळते जोती

कोण उठवितो क्रांती

आता जीवन संपले

कोणी जीवन दिले

जीवन दिले पिलाला

आराधना करु द्या आम्हांला

# शाळा नसती तर......

शाळा नसती तर ,

नाही राहणार सर

शाळा नसती तर मिळाले नसते शिक्षण

कसे होणार रक्षण

शाळा नसती तर ईशा मैत्रीण नसती

नाही सुचती युक्ती

शाळा नसती तर केल्या नसत्या कविता

भेटायला आली नसती सविता

शाळा नसती तर

मिळाला नसता अभ्यास

शाळा नसती तर

कोणतेच नसते सर

# वाढदिवस...

आज माझा वाढदिवस

पुरा झाला नवस

हा आंनदाचा दिवस

शुभेच्छा देतात सर

समुद्राचा समान सागर

कोण वाढदिवसाला हजर

वाढदिसाचे कार्ड तयार करा

वाढदिवशी आनंदी रहा

## महात्मा फुले जयंती ...

आज जंयती महात्मा फुले यांची

सोबत माझ्या बाबांची

घाई कुणाला कामाची

करु या साजरी जयंती

महात्मा फुले यांना सुचली होती युक्ती

त्यांच्या मुळे मी शाळेत आली

आमची शाळा सुंदर झाली

जयंती आम्ही साजरी केली

मजा आम्ही खुप खुप मारली

# सुट्टी

दिवाळीला व आखाजीला राहते सुट्टी

पक्षांसोबत करु आपण सुट्टी

रविवारी सुद्धा राहते सुट्टी

हातात धरली मी सुट्टी

सुट्टीत मजा येते खुप खुप

माकड करते हुप हुप

सुट्टीत धरा पाटीपुस्तक

सुधारेल आपले मस्तक

शाळेत रहा नेहमी हजर

माझी आहे सर्वांवर नजर

# घर...

हे आमचे घर

त्यात राहु जीवनभर

घरात आहेत पेडे

घरात घुसले वेडे

ते आहे खेडे

घराला घातल्या माळा

घरात तुम्ही खेळा

घरात होता नळा

घराला मिळाला मान

मला दोन कान

घर आहे खुप छान.



# झाड ...

झाडाला उगले फुले

आम्ही लहान मुले

झाडाखाली पडली वही

ती माझी नाही

झाड आहे मोठे

आम्ही झाडापेक्षा छोटे

झाड आहे निर्मळ

पोटात लागली कळ

सारे करूया मेळ

खेळूया आपण खेळ

# दहिहंडी...

आज आहे दहिहंडी

ती आहे कापडाची गुड्डी

दहिहंडी फोडंतो गोविंदा

एका बाईचे नाव जोधा

दहिहंडीत होता रंग

त्याला पाहुन आम्ही होतो दंग

दहिहंडीत येते मजा

मला झाली सजा

दहिहंडीची तुटली दोरी

दहिहंडीला नांच गं पोरी

## शेतकरी ...

माझा बाप शेतकरी
बोला ओम हरी
तो आहे शेतकरी
आल्या आल्या पावसाच्या सरी
शेतकरी करतो काम
आम्ही खाल्ला जाम
शेतकरीचे नाव राम
बाप करतो काम
शेतकरी आहे छान
त्याच्या शेतात पान





शेतकरी

निशा भागवराव
शेंदळ

# पोळा

आज आहे पोळा

हा आनंदाचा सोहळा

आज आहे पोळा

मी खाल्ला पुरणाचा गोळा

आज आहे पोळा

आला आला पावसाळा

आज आहे पोळा

बैलांना घालु तोरण माळा

आज आहे पोळा

मुलानों तुम्ही खेळा

## ज्ञान ...

मला मिळाले ज्ञान

गुरुजी किती छान

ज्ञान घे रे भाऊ

ज्ञानाच्या पायऱ्यांवर जाऊ

ज्ञानाला हिंदीत म्हणतात ग्यान

सुंदर सुंदर करू या आपण ध्यान

ज्ञान द्या मुलांना

ज्ञान द्या सर्वांना

# टॅब ...

माझ्याकडे टॅब

करते मी अभ्यास

पिक्स आर्ट मध्ये चित्र काढते

रंग मी त्याला देते

ब्रेन कॉलेज तुम्ही पहा

त्यातला अभ्यास जाणून घ्या

टॅब मध्ये आहे गॅलेरी

मी बोलते स्वारी

टॅब आहे माझा मित्र

मी काढले त्यात चित्र .



# ढग ...

ढगा रे ढगा एकदा पाड पावसाच्या सरी

नाचत गाजत जाऊ आम्ही घरी

ढगा रे ढगा मी झाली बावरी

मला होऊ दे ना सुंदर परी

ढगा रे ढगा तु गातो म्हणे सुंदर गाणी

मी ऐकली आहेत सुंदर गाणी

ढगा रे ढगा तु किती छान नाचतो

तुझा हेवा मला वाटतो

ढगा रे ढगा शेतकऱ्यांना करु नको दुखी

आम्ही आहोत आंनदी सुखी.



ढग



# विद्यार्थी ...

मला आवडतो विद्यार्थी

मी आहे विद्यार्थी

शाळेत राहतो विद्यार्थी

खुप नाचतो विद्यार्थी

खुप लिहितो विद्यार्थी

खुप ऐकतो विद्यार्थी

खुप बोलतो विद्यार्थी

खुप फिरतो विद्यार्थी

लिहत राहतो विद्यार्थी

खुप खुप शिकतो विद्यार्थी

## पाऊस...

आला आला पाऊस

घरी करु हाऊस

आले आले पावसाचे थेंब

सर्वांना खेळु द्या गेम

पावसाची लागली रेस

तोंडाला आला फेस

थेंबाला आहे कोणता रंग

मातीचा आला सुगंध

पावसाचा १ थेंब आला

पावसाच्या आंनदात शेतकरी न्हाला

## पक्षी ...

मी आहे पक्षी

मला जाऊ द्या

झाडावरुन शेतात.

मी आहे पक्षी

मला जाऊ द्या

खिडकीतून घरात.

मी आहे पक्षी

मला जाऊ द्या

घरातुन शाळेत.

मी आहे पक्षी

मला जाऊ द्या

लहान मुलात.

# शाळा...

ही माझी शाळा

मी घातल्या शाळेला माळा

शाळेत सर्वजण खेळा

मी चालली शाळेतुन घरी

मी आहे सोन्याची परी

मुलानों तुम्ही नाचा

शब्द आता वाचा

मुलानों तुम्ही पळा

होईल आपला मेळा



# ई साहित्य प्रतिष्ठान



ई साहित्य प्रतिष्ठान ही काही व्यावसायिक प्रकाशन संस्था नाही. काही सामाजिक ध्येय डोळयांसमोर ठेवून मराठी भाषा, साहित्य आणि संस्कृती यांच्यासाठी ही तरुणांची संस्था काम करते आहे. सध्या ई साहित्य प्रतिष्ठानचे सव्वा दोन लाख वाचक आहेत.

ई साहित्य प्रतिष्ठानच्या पुस्तक खजिन्यात सातत्याने नवनवीन भर पडत असते. २०१४ मध्ये सुमारे शंभर ई पुस्तके आम्ही प्रकाशित केली, २०१५ मध्ये सव्वाशे. २०१६ मध्ये नवीन खूप सारी पुस्तकं लवकरच येत आहेत. एकाहून एक भारी. ही सर्व पुस्तकं सर्वच्यासर्व साडेतीन लाख वाचकांना देण्याचा आटोकाट प्रयत्न केला जातो. पण प्रत्येक वेळी ते जमतेच असे नाही. अनेक वाचकांपर्यंत काही पुस्तके पोहोचत नाहीत. पण VIP सदस्यांना मात्र सर्व पुस्तके नक्की दिली जातात. तुम्हाला सर्वच्या सर्व पुस्तके हवी असतील तर VIP सभासद बना.

VIP सभासद बनणं अगदी सोप्पं आहे. आपल्या ओळखीच्या दहा लोकांचे मेल आय डी कळवा आणि बना VIP सभासद.

संपर्क साधा : esahity@gmail.com

ही सेवा पूर्णपणे निःशुल्क आहे. त्यामुळे आपले मित्र आपल्यावर खुश होतील. शिवाय आम्ही ही खात्री देतो की या ई मेल्सचा वापर फ़क्त आणि फ़क्त मराठी साहित्य पाठवण्यासाठीच केला जाईल. इतर कसल्याही जाहिराती पाठवून त्यांना त्रास दिला जाणार नाही. तेव्हा

लवकरात लवकर आपल्या माहितीतल्या दहा किंवा अधिक मराठी साक्षरांचे ई मेल पत्ते आम्हाला द्या.

www.esahity.com या वेबसाईटला भेट द्या.

आपल्या पत्राची वाट पहात आहोत.

धन्यवाद

आपले नम्र

टीम ई साहित्य प्रतिष्ठान

